महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर करिता मौजा वारंगा येथील स्थायी कॅम्पस बांधकामामध्ये नविन इमारतीच्या बांधकामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. एनएलयुएन-२०२१/प्र.क्र.०६/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ डिसेंबर, २०२१.

**पहा :-** १) मा.मंत्रिमंडळाची दिनांक १५.०३.२०१८ रोजीची बैठक.
२) शासन निर्णय क्र.एनएलयु-२०१६/प्र.क्र.१०५/विशि-२, दि.२७.०३.२०१८.
३) कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर यांचे पत्र क्रः- एमएनएलयूएन/आर/२०२१/११, दि.१५.०१.२०२१.
४) समक्रमांकाचा दि.०३.०८.२०२१ रोजीचा शासन निर्णय.
५) कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर यांचे पत्र क्र.मराविविना/र/२०२१/२७८, दि.१२.०८.२०२१ व दि.२७.०८.२०२१ रोजीचे पत्र.
६) मा.मंत्रिमंडळाची दि.०८.१२.२०२१ रोजीची बैठक.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ येथील मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक १५.०३.२०१८ च्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर करिता मौजा वारंगा, जि. नागपूर येथे ६० एकर जागेत नवीन विद्यापीठ परिसरातील विविध बांधकामांकरिता संदर्भ क्र.२ येथील दि.२७.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये रु.२३१.४५ कोटी इतक्या अंदाजपत्रकीय रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. यामध्ये शासन दायित्व रु.१५०.०० कोटी इतके निश्चित करण्यात आले आहे. यामध्ये खालील कामांचा समावेश आहे.

(अ) विधी विद्यापीठाचे ग्रंथालय,
(ब) शैक्षणीक संकुल (Academic Block),
(क) प्रशासकीय संकुल (Administrative Block),
(ड) विद्यापीठाची संरक्षक भिंत, प्रवेशद्वार व अंतर्गत रस्ते,
(इ) कुलगुरुसाठी निवासस्थान

उपरोक्त सर्व बांधकामे प्रगती पथावर असून, त्याकरीता आतापर्यंत शासन दायित्वाचे रु.१५० कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे.

२. महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर यांनी वारंगा येथील स्थायी कॅम्पस बांधकामामध्ये नविन इमारती म्हणजे मुलांमुलींचे वसतिगृह, ॲमेनिटी ब्लॉक, १ बीएचके स्टाफ क्वार्टर, मा.कुलपती यांचे निवासस्थान, कुलसचिव यांचे निवासस्थान, बँक व वाहनतळ इत्यादी बांधकामे नव्याने समाविष्ट करण्याकरीता प्रस्तावित केली होती.

३.  उपरोक्त कामांच्या अनुषंगाने इतर खर्च समावेश करुन अंदाजपत्रक व नकाशे संबंधित मुख्य अभियंता यांच्याकडून स्वाक्षंकित करुन संदर्भ क्र.३ येथील दि.१५.०१.२०२१ च्या पत्रान्वये शासन मान्यतेस्तव सादर केले होते. त्यानुसार महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर, या विद्यापीठाचे वारंगा येथील स्थायी कॅम्पस बांधकामांमध्ये मुलां- मुलींचे वसतिगृह, ॲमेनिटी ब्लॉक, १ बीएचके स्टाफ क्वार्टर, मा.कुलपती, कुलसचिव यांचे निवासस्थान, बँक, वाहनतळ इत्यादी बांधकामाचे रु.१७०,१२,५८,५५६/- इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक व नकाशे संबंधित मुख्य अभियंता यांच्याकडून स्वाक्षंकित करुन यांची तांत्रिक पडताळणी करुन त्यास मान्यता देण्याकरिता सार्वजनिक बांधकाम विभागास विनंती करण्यात आली होती. सार्वजनिक बांधकाम विभाग व उच्च स्तरीय समितीने मान्यता दिल्यानुसार सदर कामाच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

४.  तथापि, सदर बांधकामाकरीता विद्यापीठाच्या स्वनिधीतून, कर्ज माध्यमातून तसेच इतर स्त्रोतामार्फत निधी उपलब्ध करुन देणे शक्य नसल्याचे तसेच विद्यापीठाचे शिक्षण शुल्क तसेच इतर बाबींतून सुध्दा उत्पन्नाचे स्त्रोत मर्यादीत असल्याचे तसेच या कामाकरीता अधिक कर्ज घेणे शक्य नसल्याने सदर शासन निर्णयात सुधारणा करुन रु.९५१५.९७ लक्ष निधी उपलब्ध करुन देण्याची संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. तद्नुषंगाने संदर्भ क्र.४ येथील दि.०३.०८.२०२१ रोजीच्या शासन निर्णय अधिक्रमित करुन सुधारित नव्याने आदेश निर्गमित करुन त्यास मान्यता देण्याकरीताचा प्रस्ताव मा.मंत्रीमंडळापुढे ठेवण्यात आला होता. सदर प्रस्तावास मा.मंत्रीमंडळाने संदर्भ क्र.६ येथील दि.०८.१२.२०२१ रोजीच्या बैठकीत मान्यता दिली आहे. तद्नुषंगाने संदर्भ क्र.४ येथील दि.०३.०८.२०२१ रोजीच्या शासन निर्णय अधिक्रमित करुन नव्याने आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

मा.मंत्रिमंडळाच्या दि.०८.१२.२०२१ च्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार दि.०३.०८.२०२१ रोजीचा शासन अधिक्रमित करण्यात येत आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाने प्राप्त अंदाजपत्रकांमध्ये सुधारणा करुन प्रशासकीय मान्यतेसाठी येणारी विषयांकीत कामाची किंमत रु.९५१५.९७ लक्ष अशी निश्चित केली असून, दि.०४.०३.२०२१ रोजी झालेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीत सदर कामाच्या रु.९५.१५ कोटी अंदाजपत्रकीय रक्कमेस मान्यता देण्यात आली असल्याने खालील नमूद विविध कामांना खालील अटींच्या अधिन राहून याद्वारे प्रशासकीय मान्यता (सोबत जोडलेल्या Recapitulation Sheet नुसार) देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | इमारतींचे नाव | अंदाजपत्रकातील रक्कम |
|---|---|---|
| १. | मुलांचे वसतिगृह | २०,६४,०९,०००/- |
| २. | मुलींचे वसतिगृह | २०,६४,०९,०००/- |
| ३. | ॲमेनिटी ब्लॉक | ८,०६,२५,२७०/- |
| ४. | १ बीएचके स्टाफ क्वार्टर | १०,०८,०१,९०५/- |
| ५. | मा.कुलपती यांचे निवासस्थान | ९६,०८,५७०/- |
| ६. | कुलसचिव, यांचे निवासस्थान | १,१४,३२,९२०/- |
| ७. | बँक | ४१,५३,५००/- |

| | | |
|---|---|---|
| ८. | वाहनतळ | ३८,९६,०६८/- |
| | **एकूण** | **६२,३३,३६,२३३/-** |
| १. | पाणी पुरवठा व स्वच्छता | ३,११,६६,८१२/- |
| २. | विद्युतीकरण | ६,८५,६६,९८६/- |
| ३. | रिटेनिंग वॉल व एसटीपी | २,७२,६५,०००/- |
| ४. | कॉन्टीजेन्सी, जीएसटी व इतर | २०,१२,६२,१८१/- |
| | **एकूण** | **९५,१५,९७,२११/-** |

(१) उक्त तक्त्यात नमूद केलेल्या इमारतीचे बांधकामासाठी रु.९५१५.९७ लक्ष निधी शासनाकडून टप्प्याटप्प्याने उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच सदर बांधकामासाठी या व्यतिरिक्त अधिकच्या निधीची आवश्यकता भासल्यास विधी विद्यापीठाने इतर स्रोतांमार्फत निधी उभारावा. उभारलेल्या निधीबाबत राज्य शासनाचे कोणतेही दायित्व राहणार नाही.

(२) निधी उभारण्याकरीता विधी विद्यापीठ यांनी विविध कायदेविषयक नाविन्यपूर्ण अभ्यासक्रम/ प्रमाणपत्र कोर्सेस (Certificate Courses) सुरु करावेत. तसेच सी.एस.आर, देणगीदार इत्यादी माध्यमातून निधी उभारणी करावी.

(३) या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या इमारतींच्या बांधकामासाठीच सदरचा निधी वापरण्यात यावा.

(४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

(५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(६) वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील तरतुदी व अटीचे ततोतंत पालन करावे. तसेच शासनाच्या प्रचलित नियम व अटी, शर्ती विचारात घेऊन कार्यवाही करण्यात यावी.

(७) सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी निधी उभारण्याची मंजुरी दिली आहे, त्या निधीचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

(८) दि.२७.०३.२०१८ च्या शासन निर्णयातील इतर अटी व शर्ती कायम राहतील.

५. महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ अधिनियम २०१४ नुसार शासनाकडून मंजूर झालेले अनुदान हे विद्यापीठ निधीत जमा करुन अनुदानाचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी कार्यकारी परिषदेची असेल. तसेच सदर अनुदानातून करण्यात आलेल्या खर्चाचे विनिमय करुन खर्चाच्या लेख्यांचे विवरणपत्र महापरिषदेपुढे ठेवून त्यास मान्यता घेण्याची कार्यवाही विद्यापीठाने करावी.

६. कुलगुरु, महाराष्ट्र राष्टीय विधी विद्यापीठ, नागपूर यांना शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे, हे अनुदान त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात आले आहे, हे पाहण्याची जबाबदारी कुलगुरु यांची असेल. यासंदर्भात त्यांनी कार्यकारी परिषदेची मान्यता घेऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र उच्च शिक्षण संचालनालयामार्फत शासनास सादर करावे.

७. सदरहू मंजूर झालेली तरतुद महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर यांना तातडीने सुपूर्द करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

८. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

९. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२११२२०१०५०१०१७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.12.20 10:52:15 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. कुलपती महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर.
३. कुलगुरु, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर.
४. उप सचिव, मा. मुख्य सचिव यांचे यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर.
७. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

९. सहसंचालक (उच्च शिक्षण), नागपूर विभाग, नागपूर.

१०.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र नागपूर.

११.महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२, महाराष्ट्र नागपूर.

१२.अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ नागपूर.

१३.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ नागपूर.

१४.कार्यासन अधिकारी (का-१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५.वित्त विभाग,(व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.

१६.कक्ष अधिकारी (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७.मा.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१८. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.